# बेंजामिन फ्रँकलिन



योना झेल्डिस मॅक्डोनो; चित्रे: मॅल्का झेल्डिस



त्या दोन व्यक्ती रस्त्यावरून वेगाने चालत होत्या. त्यांचे डोळे आभाळात गडगडणाऱ्या ढगांकडे लागले होते. एकाच्या हातात विचित्र आकाराचा पतंग होता. त्याच्या वरच्या टोकाला एक धातुची तार होती. पतंगाच्या दोराला एक चावी लटकत होती. ते दोघे एका मैदानात पोहोचले आणि पाऊस सुरू झाला. त्याचवेळी आभाळात प्रकाश चमकला. काही वेळ काहीच घडले नाही. दोघे निराश होऊन एकमेकांकडे पाहू लागले. तेव्हाच पतंगाचा दोर पकडून ठेवलेल्या व्यक्तिने दोराचे तंतू ताठर झाले असल्याचे पाहिले. जणू काही ते तंतू जिवंत झाले होते. त्याने आपले बोट दोराला लटकलेल्या चावीला लावले आणि त्याला विजेचा झटका बसला. त्याच्या अपेक्षेनुसार आभाळातील विजेची एक ठिणगी ओल्या दोरातून धातुच्या चावीपर्यंत पोहोचली होती आणि त्यामुळे चावीला स्पर्श केल्यावर विजेचा झटका बसला. त्या व्यक्तीचे नाव होते बेंजामिन फ्रँकलिन. आपल्या मुलाच्या, विल्यमच्या मदतीने त्याने सिद्ध केले की आभाळात चमकणाऱ्या प्रकाशाची ठिणगी ही वीजच असते.

1706 साली कडाक्याच्या थंडीतील एके दिवशी बेंजामिन फ्रँकलिनचा जन्म झाला. त्याचे वडील जोशिया, बोस्टन शहरात साबण आणि मेणबत्त्या बनवत असत. त्याची आई अबिया, आपल्या तेरा मुलांची देखभाल करत असे. ते सगळे चार खोल्यांच्या एका घरात राहात. लहान वयातच बेंजामिन वाचायला शिकला. थंडीच्या दिवसात दुपारी तो उबदार चादर अंगावर ओढून पुस्तक वाचत बसे. त्याचे आईवडील श्रीमंत नव्हते. त्यांच्याकडे फारशी पुस्तके नव्हती. पण बेनला त्याने काही फरक पडत नसे. तो तीच पुस्तके वारंवार वाचत असे. या पुस्तकांमध्ये कठीण शब्द असत आणि त्यांत चित्रेही फारशी नसत.



सात वर्षांचा असताना बेनने एक कविता लिहिली. ते पाहिल्यावर त्याच्या आईवडिलांनी त्याला शाळेत पाठवले. त्याकाळी खूप कमी मुले शाळेत जात. शाळेत जाणे ही मुलांसाठी गौरवाची गोष्ट होती. बेन लिखाण आणि वाचन करण्यात कुशल होता पण तो गणितात कमजोर होता. वापरात नसलेली प्राचीन लॅटीन भाषा का शिकायची, असा प्रश्न त्याला पडे. वयात आल्यावर बेंजामिन कुरळ्या केसांचा, चमकदार डोळ्यांचा धट्टाकट्टा युवक बनला. त्याला पतंग उडवायला आणि पोहायला खूप आवडे. पोहोताना तो आपल्या हातापायांना वल्ही बांधत असे. वल्ह्यांमुळे वेगाने पोहोता येते, असे त्याला वाटे.





दोन वर्षांनंतर बेन शाळा सोडून आईवडिलांना दुकान चालवायला मदत करू लागला. त्याला मेंढ्या व गायींच्या चरबीपासून बनलेल्या मेणबत्त्यांचा दुर्गंध आवडत नसे. म्हणून आईवडिलांनी त्याच्यासाठी इतर काम शोधायला सुरूवात केली. बेनला सुतारकाम, विटांचे काम, पितळेच्या वस्तू बनवण्याचे कामही रुचले नाही. बेनचा मोठा भाऊ जेम्सचे बॉस्टनमध्ये पुस्तक छपाईचे दुकान होते. बेनला पुस्तके आवडतात म्हणून जोशियाने त्याला तिथे काम शिकायला पाठवले.

बेनला भावासाठी काम करणे पसंत नव्हते. पण विटांच्या कामापेक्षा बरे, म्हणून तो राजी झाला. अशा रितीने 1718 साली वयाच्या बाराव्या वर्षी छपाईचे काम शिकताशिकता बेनच्या व्यावसायिक जीवनाला सुरुवात झाली.

जेम्सच्या दुकानात बेन धातुची छोटी छोटी अक्षरे साच्यांमध्ये बसवायला शिकला. हे साचे कागदावर शब्द छापण्यासाठी वापरत. लवकरच तो कथा-कवितांच्या पुस्तिका छापू लागला. त्याने स्वत: त्याकाळी गाजलेल्या दोन घटनांवर *दिपस्तंभाची शोकांतिका* आणि *ब्लॅकबिअर्ड चाच्याचा मृत्यू* या कविता लिहिल्या. जेम्सने त्या प्रकाशित केल्या. यामुळे बॉस्टनमध्ये बेनची चर्चा होऊ लागली. 1721 साली जेम्सने *द न्यू इंग्लंड कुरंट* हे स्वत:चे वृत्तपत्र सुरू केले. बेन स्वत:च ते छापून त्याच्या प्रती ग्राहकांना वाटत असे. पण जेम्सला ते पसंत नव्हते.

बेन एका काल्पनिक विधवा स्त्रीचे पात्र घेऊन *सायलेन्स दोगुड* या नावाने लिहू लागला. जेम्सला वाटे की खरोखरच या नावाची कुणी स्त्री आहे जिला तिचे लेख छापायचे आहेत. तो हे लेख प्रकाशित करू लागला. लवकरच लोकांचे कुतूहल चाळवले. ही *सायलेन्स दोगुड* आहे तरी कोण? बेनच या लेखांचा लेखक आहे, हे उघड झाले तेव्हा लोकांनी त्याचे कौतुक केले. जेम्सला मात्र ही गोष्ट अजिबात आवडली नाही. काही काळानंतर जेम्स एका संकटात सापडला. त्याने इंग्रज अधिकाऱ्यांविरोधात लेख छापल्यामुळे त्याला तुरुंगाची हवा खावी लागली. त्याला वृत्तपत्र छापण्यास मनाई करण्यात आली. मग जेम्सने बेनला प्रकाशक बनवायचा विचार केला आणि आपले वृत्तपत्र चालू ठेवायचे ठरवले. पण बेनला हे मान्य नव्हते. यावरून दोघा भावांमध्ये खूप वाद झाला आणि बेन ते काम सोडून निघून गेला.



थकला-भागला, भुकेला बेन फिलाडेल्फियाला पोहोचला. त्याने एका बेकरीतून प्रत्येकी एका पेनीमध्ये तीन पाव विकत घेतले. एक पाव त्याने तोंडात टाकला. त्याचे दोन्ही खिसे भरलेले असल्यामुळे उरलेले दोन पाव त्याने बगलेत ठेवले. हे पाहून जवळच उभी असलेली एक मुलगी जोरजोरात हसू लागली. तिचे नाव होते डेबोरा रीड. बेन आणि तिचा परिचय झाला. बेनला तिच्याच घरात भाड्याने एक खोली मिळाली. त्याला एका छापखान्यात कामही मिळाले. छापखान्याच्या मालकाने त्याला तेथील कामावर देखरेख करण्याचे काम दिले. फिलाडेल्फियाचे गव्हर्नर बेनच्या कामाने प्रभावित झाले. त्यांनी बेनला स्वतःचा व्यवसाय सुरू करण्यासाठी पैशाची मदत देऊ केली. या पैशातून बेनने इंग्लंडला जाऊन छापखान्याची यंत्रे व इतर वस्तू खरेदी कराव्यात, असे त्यांनी सुचवले.

अठरा वर्षांचा बेन जहाज प्रवासाच्या विचाराने हरखला. 1724 साली तो लंडनला निघाला. पण गव्हर्नरने त्याची फसवणूक केली. बेनला गव्हर्नरकडून पैसा तसेच शिफारसपत्रही पोहोचले नाही. घरापासून तीन हजार मैल दूर अंतरावर बेनच्या खिशात फुटकी कवडीदेखील नव्हती. कसंतरी करून त्याला लंडनच्या एका छापखान्यात काम मिळाले. घरी जाण्यासाठी लागणारा पैसा जमा होईपर्यंत बेन तिथेच राहिला.





घरी परतल्यावर बेनला जुन्या छापखान्यातले काम पुन्हा मिळाले. पण लवकरच त्याने स्वतःचा व्यवसाय सुरू केला. 1729 सालापर्यंत तो पेनसिल्व्हानिया गॅझेट नावाच्या वृत्तपत्राचा प्रकाशक बनला. या वृत्तपत्राचा संपादक आणि वार्ताहरसुद्धा तोच होता. या वृत्तपत्रात विनोद, कोडी आणि संपादकांना आलेली पत्रे छापून येत. जेव्हा पुरेशी पत्रे येत नसत तेव्हा बेन वेगवेगळ्या काल्पनिक नावांनी स्वतःच पत्रे लिहून छापत असे. तो त्याच्या वृत्तपत्रात कार्टुन चित्रेही काढत असे. अमेरिकन वृत्तपत्रात प्रथमच कार्टुन चित्र छापण्याचा मान बहुधा याच वृत्तपत्राकडे जातो.



दरम्यान, बेनला विल्यम नावाचा एक मुलगा झाला. त्याच्या आईबद्दल काही माहिती उपलब्ध नाही. पण बेनने डेबोरा रीडशी लग्न केले. बेनने बगलेत पाव ठेवल्यावर जोरजोरात हसणारी तीच मुलगी होती ही. तो तिला डेबी म्हणत असे. डेबीने छापखाना आणि त्याच्या शेजारचे पेन, शाई, मेणबत्त्या, पुस्तके इत्यादी साहित्याचे दुकान चालवण्यात बेनला मदत केली. बेन आणि डेबीला दोन मुले झाली, फ्रँक आणि सॅली. फ्रँक चार वर्षांचा असताना त्याला देवीचा आजार झाला आणि त्यात त्याचा मृत्यू झाला. पुढचे चार महिने बेन दुःखात बुडून गेला.

डेबीच्या मदतीमुळे बेनला आपल्या व्यवसायात खूप यश मिळाले. 1732 साली बेन *गरीब रिचर्डचे पंचांग* प्रकाशित करू लागला. त्यामध्ये सुट्ट्यांचे दिवस, ऋतू, उत्सव, सण, न्यायालयीन कामकाजाचे दिवस, भरती-ओहोटीच्या वेळा, सूर्य व चंद्र ग्रहण, पौर्णिमा-अमावस्या तिथी वगैरे माहिती असे. यात बेन *रिचर्ड सॉंडर्स* या नावाने आपल्या आयुष्यातील छोट्या-मोठ्या मजेदार गोष्टी, हसतखेळत दिलेले सल्ले आणि काही शहाणपणाचे बोलही देत असे. उदाहरणार्थ, *आपले कर्ज चुकवा आणि स्वतःची किंमत ओळखा, घाईघाई फुकट जाई* आणि *तुम्ही एक रुपया वाचवता तेव्हा एक रुपया कमावता* इत्यादी. हे पंचांग बरेच लोकप्रिय झाले. बेनने यातून भरपूर पैसा कमावला आणि तो श्रीमंत झाला. आता त्याला छापखाना चालवण्याची आवश्यकता नव्हती. ते काम त्याने एका भागीदाराकडे सोपवले. बेन फक्त 42 वर्षांचा होता. काही कर्तृत्व गाजवण्यासाठी अजून त्याच्यात भरपूर उर्जा शिल्लक होती.



बेनला फिलाडेल्फिया शहरातील जनजीवनात काही सुधारणा कराव्याशा वाटे. पुस्तकांची आवड असल्यामुळे त्याने 1731 साली देशातील पहिले सार्वजनिक ग्रंथालय सुरू केले. बेनने 1736 साली पहिला अग्निशमन विभाग स्थापन करण्यात मदत केली. त्यामध्ये तीस स्वयंसेवक काम करत होते. त्याने शहरात पक्के रस्ते बनवण्यासाठी, त्या रस्त्यांवर दिवे लावण्यासाठी आणि रस्त्यांची साफसफाई करण्यासाठी शहराच्या प्रशासनाला उद्युक्त केले. 1751 साली फिलाडेल्फियामध्ये देशातील पहिले हॉस्पीटल स्थापन करण्यात बेनने महत्त्वाची भूमिका निभावली.



चार वर्षांनंतर बेनने तरुणांसाठी एका प्रशिक्षण केंद्राची स्थापना केली. पुढे त्याचे रुपांतर पेनसिल्व्हानिया विद्यापीठात झाले. या विद्यापीठाच्या एका भागात गरीब मुलांसाठी विनामूल्य तत्वावर शाळा चालत असे. यापूर्वीच 1737 साली बेनला पोस्टमास्तर बनवण्यात आले होते. 1753 साली इंग्रज प्रशासनाने त्याला संपूर्ण अमेरिकेचा सहायक पोस्टमास्तर बनवले. बेनने या काळात अधिक पोस्टमनची भरती केली आणि पोस्टाच्या सेवेत सुधारणा केली. बेनच्या प्रयत्नांमुळे केवळ त्याच्याच शहरात नाही तर देशाच्या इतर भागांतील जनजीवनातही सुधारणा झाल्या.



सुरुवातीपासूनच बेनला विज्ञानात विशेष रुची होती. 1752 साली त्याने विल्यमसोबत आभाळातील विजेबाबत विस्मयकारक शोध लावला. बेनने नेमके काय केले याबाबत सर्वांना कुतूहल होते. पण बेनला त्याचे फारसे अप्रुप नव्हते. तो म्हणत असे, “तत्वज्ञानाचा प्रत्यक्ष व्यवहारात उपयोग होत नसेल तर काय फायदा?” तो आभाळातून पडणाऱ्या विजेचा धोका कमी करण्याचा प्रयत्न करत होता. त्याच्या विचारानुसार, इमारतींच्या वर धातुचा एक दांडा लावण्यात आला. त्याला एक धातुची तार जोडण्यात आली. तार इमारतीच्या भितीच्या आधाराने खाली आणून तिचे दुसरे टोक जमिनीत घुसवण्यात आले. यामुळे आभाळातील वीज इमारतीवर पडल्यावर तारेतून जमिनीत शिरू लागली आणि इमारत आणि त्यात राहाणारे लोक सुरक्षित राहू लागले.

बेनने असा धातुचा दांडा आपल्या घरावर बसवला. लवकरच इतर इमारतींवरही असे धातुचे दांडे बसवण्यात आले. यात मेरीलँड राज्यातील ॲनापोलीस शहरातील इमारतींचाही समावेश होतो. बेनने आपल्या या शोधाचे पेटंट घेऊन नफा कमावण्यास नकार दिला. याउलट, त्याने धातुचा दांडा बसवण्याबाबत सगळी माहिती प्रकाशित केली. यामुळे लोकांना आपल्या घरावर असा दांडा बसवणे शक्य होऊ लागले.



बेनने विज्ञानाचा उपयोग दैनंदिन व्यवहारात केला. त्याने बनवलेल्या *फ्रँकलिन शेगडी*मुळे घरातील शेकोटीची उष्णता धुरांड्यामधून बाहेर वाया जाण्याऐवजी घरातील खोल्या उबदार ठेवण्यासाठी वापरता येऊ लागली. त्याने शहरातील रस्त्यांवर जास्त काळ प्रकाश देऊ शकतील असे दिवे तयार केले. बेनचे वय वाढत गेले तसे त्याला दोन चष्म्यांची गरज वाटू लागली, एक वाचनासाठी आणि दुसरा दूरचे पाहाण्यासाठी. मग त्याने दोन्ही चष्म्यांची भिंगे जोडून एकाच फ्रेममध्ये बसवली. अशा प्रकारे *बायफोकल* चष्म्याची निर्मिती झाली. आजही लोक असे चष्मे वापरतात. बेन व्हायोलिन, हार्प आणि गिटार वाजवत असे. त्याने *ग्लास आर्मोनिका* हे एक नवेच वाद्य तयार केले. हे वाद्य वेगवेगळ्या मापाच्या काचेच्या पेल्यांपासून बनलेले होते.

बेनला राजकारणातही रस होता. 1736 साली त्याला पेनसिल्व्हानिया विधानसभेच्या लेखनिकपदी निवडण्यात आले. पंधरा वर्षे त्याने विधानसभेतील सर्व कामकाजाची, वादांची, चर्चांची नोंद ठेवली. तेथील वाद-चर्चा ऐकून तो पुरता कंटाळून जात असे. पण लेखनिक असल्यामुळे तो त्यात भाग घेऊ शकत नव्हता. म्हणून मग 1751 साली तो विधानसभेच्या निवडणुकीत उमेदवार म्हणून उभा राहिला आणि जिंकूनही आला.



तीन वर्षांनंतर 1754 साली उत्तर अमेरिकेवर प्रभुत्व प्रस्थापित करण्यासाठी फ्रेंच आणि ब्रिटिश यांच्यात युद्ध सुरू झाले. रेड इंडियन लोक फ्रान्सला तर अमेरिकेच्या तेरा वसाहती ब्रिटनला मदत करत होते. बेनने युद्धात ब्रिटिश कर्नल म्हणून भूमिका पार पाडली. त्याने व विल्यमने सैनिकांचे नेतृत्व केले, किल्ले बांधले, गस्ती पथके उभारली. पण वसाहतींना लढण्यासाठी निधी कमी पडत होता. मग 1757 साली निधी गोळा करण्यासाठी बेन आणि विल्यम इंग्लंडला गेले. प्रवासात त्यांना अनेक संकटांना तोंड द्यावे लागले. त्यांना फ्रेंच समुद्री चाच्यांपासून स्वतःचा बचाव करावा लागला. त्यांना अनेक वादळांशी सामना करावा लागला. त्यांचे जहाज उध्वस्त होता-होता बचावले.

अखेरीस ते लंडनला पोहोचले. तिथे बेन पाच वर्षे राहिला आणि त्याने युद्धासाठी निधी उभारला. दरम्यान विल्यमने तिथे कायद्याचा अभ्यास केला. अमेरिकेचा प्रमुख संशोधक म्हणून बेनला तिथे खूप मानसन्मान मिळाला. विल्यमला किंग जॉर्ज तृतीय यांनी न्यू जर्सी राज्याच्या गव्हर्नरपदी नेमले. तिथेच विल्यमचे लग्नही झाले. 1762 साली बेन फिलाडेल्फियात परतला. काही वर्षांनंतर विल्यम आणि त्याची पत्नीदेखील अमेरिकेत परतले.



त्याचवेळी अमेरिकेत काही नव्या समस्या उद्भवल्या. पेनसिल्व्हानिया वसाहत स्थापन करणारे पेन कुटुंब तिथेच राज्य करत होते. वसाहतींच्या शासकांना आपली वसाहत इंग्लंडच्या राजाच्या नावे चालवायची होती. यासाठी बेनला 1765 साली पुन्हा इंग्लंडला पाठवण्यात आले. तिथे पोहोचताच त्याला तेथील गंभीर परिस्थितीची जाणीव झाली. इंग्लंडने फ्रेंच आणि रेड इंडियन लोकांविरुद्ध सुरू असलेले युद्ध जिंकले होते. पण युद्धामुळे इंग्लंड कर्जात बुडला होता. पैसा उभा करण्यासाठी इंग्लंडने *स्टॅम्प ॲक्ट* हा नवा कायदा लागू केला व अमेरिकेत वृत्तपत्रे आणि कागदाशी संबंधित वस्तुंवर कर लादला.

बेनला हा कर फारसा रुचला नव्हता. त्याने त्याला विरोध केला नाही. पण अमेरिकेत लोक या कायद्याच्या प्रचंड विरोधात होते. बेनने आपला विश्वासघात केला, असे अमेरिकन लोकांना वाटू लागले. त्यांनी बेनला त्याचे फिलाडेल्फियातील घर जाळून टाकण्याची धमकी दिली.

अमेरिकन लोकांच्या मनात धुमसत असलेला रोष जाणवताच बेनने *स्टॅम्प ॲक्ट* विरुद्ध आवाज उठवला, वृत्तपत्रांना पत्रे लिहिली, व्याख्याने दिली, कायदा बनवणाऱ्यांसोबत चर्चा केली. बेनच्या प्रयत्नांमुळे ब्रिटिश सरकारने हा कर रद्द केला. पण त्यांनी चहा आणि इतर काही वस्तुंवर कर लादला. या घटनेआधी बेन स्वत:ला इंग्रज समजण्यात धन्यता मानत असे. पण आता त्याचा दृष्टिकोन बदलू लागला. इंग्रज लोक अमेरिकन वसाहतीतील लोकांना समान वागणूक देत नसत. ते त्यांच्यावर कर लादत पण त्यांना मतदानाचा हक्क मात्र नाकारत.



डिसेंबर 1774 मध्ये विल्यमने पत्राद्वारे बेनला डेबोराच्या मृत्यूची बातमी कळवली. त्यावेळी डेबोरा 44 वर्षांची होती. मार्च 1775 साली बेन अमेरिकेत निघाला. तो खूप निराश अवस्थेत होता. त्याच्या पत्नीचा मृत्यू झाला होता तसेच त्याची इंग्लंडमधील मोहीम अपयशी ठरली होती. बेन अमेरिकेत पोहोचण्याआधीच 19 एप्रिल रोजी इंग्लंड आणि त्यांच्या अमेरिकन वसाहतींमध्ये युद्ध सुरू झाले.

5 मे 1775 रोजी बेन फिलाडेल्फियात पोहोचला. पुढच्याच दिवशी तो काँटिनेन्टल काँग्रेसच्या कार्यात व्यस्त झाला.

काँटिनेन्टल काँग्रेस हा अमेरिकन नेत्यांचा एक गट होता. इंग्लंडशी सुरू झालेले युद्ध जिंकायचे, हाच या गटाचा मुख्य उद्देश होता. बेनचे वय त्यावेळी 69 वर्षे होते. पण तरीही तो दररोज बारा-बारा तास काम करत असे. पोस्टमास्तर या नात्याने प्रत्येक टपाल लवकरात लवकर आपल्या इच्छित ठिकाणी पोहोचवण्याची जबाबदारी त्याच्यावर होती. त्याने इंग्रजांच्या अंमलाखाली असलेल्या कॅनडाला अमेरिकेच्या बाजुने राहायची विनंती केली. पण त्यात त्याला यश मिळाले नाही. कॅनडाच्या दीर्घ आणि खडतर प्रवासामध्ये बेन मरतामरता वाचला. कसंतरी तो फिलाडेल्फियाला पोहोचला. तिथे अमेरिकेने स्वतःला इंग्लंडपासून स्वतंत्र घोषीत करावे की नाही, यावर काँग्रेसमध्ये वाद रंगला होता.



काही लोकांच्या मते इंग्लंडने कराचा प्रश्न सोडवला तर अमेरिका इंग्लंडच्या अधिपत्याखाली राहू शकत होती. पण काही लोकांना वाटत होते की अमेरिकेने स्वतंत्र राष्ट्र बनण्याची वेळ आली आहे. त्यासाठी अमेरिकेला इंग्लंडपासून स्वतंत्र का व्हायचे आहे, याचे कारण देणे आवश्यक होते. जून 1776 मध्ये काँग्रेसने पाच सदस्यांची एक समिती बनवली. बेंजामिन फ्रँकलिनही त्याचे एक सदस्य होते. काँग्रेसने या समितीला अमेरिकेच्या *स्वातंत्र्याचा जाहिरनामा* लिहिण्यास सांगितले. या मुद्यावर काँग्रेसने 2 जुलै 1776 रोजी मतदान घेतले. बेन एक प्रभावी वक्ता होता. त्याने स्वातंत्र्याच्या बाजुने ठाम मुद्दे मांडले. साहजिकच, मतदानानंतर स्वातंत्र्याच्या बाजुने निर्णय लागला. दोन दिवसांनंतर काँग्रेसने स्वातंत्र्याच्या जाहिरनाम्यावर शिक्कामोर्तब केले. तेव्हापासून 4 जुलै हा दिवस अमेरिकेत स्वातंत्र्यदिन म्हणून साजरा केला जातो.



विल्यमने स्वातंत्र्याच्या जाहिरनाम्याऐवजी इंग्लंडला पाठिंबा दिल्याने बेनला दुःख झाले. त्यांनी विल्यमचे मन वळवण्याचा खूप प्रयत्न केला. शेवटी विल्यमला तुरुंगात टाकण्यात आले. त्याला सोडवण्यासाठी बेनने आपले वजन वापरले नाही. अमेरिका संकटात असताना असा वैयक्तिक स्वार्थ बाळगणे बेनला योग्य वाटले नाही.

युद्धात इंग्लंड जिंकण्याची शक्यता वाढली. काँग्रेसने बेनला फ्रान्सला जाऊन त्यांची मदत मिळवण्यास सांगितले. बेन खूप वृद्ध झाला होता. त्याला फ्रान्सचा प्रवास झेपणे कठीण होते. तरीही तो अनेक वादळांना तोंड देत जहाजाने फ्रान्सला गेला. ब्रिटनचे गुप्तहेर सर्वत्र संचार करत होते. बेन आपले संदेश अदृश्य शाईत लिहीत असे आणि त्याखाली गोपनीय नावाने सही करत असे.

बेनच्या शिष्टाईने फ्रान्स अमेरिकेची मदत करायला तयार झाला. 1783 साली अमेरिका हे युद्ध जिंकली. अमेरिका आणि ब्रिटनमध्ये शांततेचा करार झाला. बेनला आता घराची ओढ लागली. पण अमेरिकन काँग्रेसच्या आग्रहामुळे तो 1785 पर्यंत फ्रान्समधील राजदूत म्हणून तिथेच राहिला आणि नंतर अमेरिकेत परतला. युद्धादरम्यान विल्यमची तुरुंगातून सुटका झाली. तो इंग्लंडमध्येच राहात होता. अमेरिकेत परतताना बेन इंग्लंडलाही थांबला. विल्यम त्यांना भेटायला गेला पण बेनने त्याच्याशी संबंध ठेवण्याचे नाकारले. ब्रिटनची बाजू घेतली म्हणून बेनने विल्यमला कधीही क्षमा केली नाही.






फिलाडेल्फियाला परतल्यावर बेनचे भव्य स्वागत झाले. कालांतराने बेनला पेनसिल्व्हानिया राज्याच्या प्रमुख कार्यकारी मंडळाचा अध्यक्ष म्हणून नियुक्त करण्यात आले. वयाच्या एक्याऐंशिव्या वर्षी त्याने अमेरिकेची घटना तयार करण्यातही मदत केली. 17 सप्टेंबर 1787 रोजी अमेरिकन घटना मंजूर करण्यात आली. अमेरिकेची घटना आजदेखील प्रशासन राबवण्यासाठी सर्वोत्कृष्ट आदर्श मानली जाते.

इंग्लंडहून परतल्यानंतर बेन आपल्या मुली व नातवंडांसोबत राहू लागला. त्याची प्रकृती हळूहळू ढासळू लागली. त्याला पलंगावरच पडून राहावे लागत असे. यावेळी तो आपल्या नातवंडांशी गप्पागोष्टीं करण्यात आपले मन रमवत असे.

आयुष्याच्या शेवटच्या काळात बेनने गुलामगिरी प्रथा बंद करण्यासाठी काम केले. तो गुलामगिरी प्रथा निर्मूलन मंडळाचा अध्यक्ष होता. या विषयावर त्याने अनेक लेख लिहीले. त्याने काँग्रेसकडे गुलामगिरी प्रथा संपवण्यासंबंधी एक याचिकाही दाखल केली.

17 एप्रिल 1790 रोजी ऐन वसंत ऋतूत आजारी पडल्यामुळे बेनचे निधन झाले. त्यावेळी तो 84 वर्षांचा होता. जगभरातील देशांनी त्याच्या निधनावर शोक व्यक्त केला. त्याच्या अंतिम संस्कारावेळी वीस हजारपेक्षा जास्त लोक उपस्थित होते. निधनानंतर त्याच्यावर असंख्य कविता, लेख आणि पुस्तके लिहिली गेली. कित्येक ठिकाणी त्याचे पुतळे उभारण्यात आले. असंख्य रस्त्यांना आणि संस्थांना त्याचे नाव देण्यात आले. शंभर डॉलरच्या नोटेवर त्याचा सौम्य व हसतमुख चेहरा छापण्यात आला. आज त्याला जाऊन दीर्घ काळ लोटला आहे. पण एक प्रकाशक, संशोधक, देशभक्त आणि राजकीय नेता म्हणून त्याचा प्रभाव आजही कायम आहे. ज्या महान राष्ट्राच्या निर्मितीत त्याने महत्त्वाचे योगदान दिले ते राष्ट्र आज उत्तरोत्तर प्रगती करत आहे.



## बेंजामिन फ्रँकलिन याचा जीवनकाळ

1706: बॉस्टनमधील मिल्क स्ट्रीट येथे जन्म.

1718: भाऊ जेम्स याच्या दुकानात विनावेतन काम सुरू केले.

1722: *सायलेंट दोगुड* या नावाने विनोदी लेख प्रकाशित केले.

1723: घरातून पलायन. प्रथम न्यूयॉर्क व मग फिलाडेल्फियाला पोहोचला. भावी पत्नी डेबोरा रीडची भेट.

1724: पहिलाच जहाज प्रवास. इंग्लंडला गेला.

1726: फिलाडेल्फियाला परतला.

1728: फिलाडेल्फियात छापखाना सुरू केला.

1730: पहिला मुलगा विल्यमचा जन्म. डेबोराशी लग्न.

1731: अमेरिकेत पहिले सार्वजनिक ग्रंथालय सुरू केले.

1732: *गरीब रिचर्डचे पंचांग* प्रकाशित केले. फ्रँकचा जन्म.

1736: फिलाडेल्फियामध्ये पहिले स्वयंसेवी अग्निशमन दल स्थापन. देवीच्या आजाराने फ्रँकचा मृत्यू.

1737: फिलाडेल्फियाचा पोस्टमास्तर म्हणून नेमणूक.

1743: मुलगी सॅलीचा जन्म.

1751: पेनसिल्व्हानिया विधानसभेसाठी निवड.

1752: पतंग व चावी वापरून आभाळातील वीजेबाबत प्रयोग. दुसऱ्यांदा इंग्लंडचा जहाज प्रवास.

1762: दोन वर्षे फिलाडेल्फियात राहून पुन्हा इंग्लंडला गेला.

1766: *स्टँप ॲक्ट*च्या विरोधात संघर्ष.

1774: पत्नी डेबीचे निधन. फिलाडेल्फियात परतला. कॉँन्टिनेन्टल कॉँग्रेसमध्ये नेमणूक.

1776: *स्वातंत्र्याचा जाहिरनामा* लिहिण्याची जबाबदारी. अमेरिकेला युद्धात मदत मागण्यासाठी फ्रान्सचा प्रवास.

1783: अमेरिका व इंग्लंड यांच्यातील शांतता करारात योगदान.

1785: फ्रान्समधून परतल्यावर अमेरिकेत भव्य स्वागत.

1787: वयाच्या एक्याऐंशीव्या वर्षी अमेरिकेच्या घटनेवर स्वाक्षरी करणारी सर्वाधिक वयोवृद्ध व्यक्ती.

1789: गुलामगिरी प्रथा निर्मूलन मंडळाच्या अध्यक्षपदी नेमणूक.

1790: 17 एप्रिल रोजी निधन.



## बेंजामिन फ्रँकलिनचे शोध

**बायफोकल चष्मा:** एकाच चष्म्यामध्ये जवळचे तसेच दूरचेही स्पष्ट दिसण्यासाठी सोय.

**बिझी बॉडी:** यामध्ये दोन ते तीन आरसे विशिष्ट रचनेत घराच्या दारात व वरच्या माळ्यावर बसवतात. यामुळे वरच्या माळ्यावरील माणसाला दारात आलेली व्यक्ती दार न उघडताच दिसू शकते.

**तीन सुयांचे घड्याळ:** तास, मिनिट व सेकंद दर्शवते. यापूर्वीची घड्याळे फक्त तास व मिनिटे दर्शवत.

**एक्टेंशन आर्म:** लांब छडीपासून बनलेले यंत्र. याने उंचावर ठेवलेले सामान सहज काढता येते.

**फ्रँकलिन शेगडी:** गरम हवेला खोलीत चौफेर पसरवते व धूर धुरांड्याद्वारे बाहेर टाकते.

**लायब्ररी खुर्ची:** खुर्चीच्या खाली पायऱ्या लपलेल्या असतात. त्या बाहेर काढून त्यावर उभे राहून उंचावर ठेवलेली पुस्तके काढता येतात.

**वीज वाहून नेणारा दांडा:** आभाळातून पडणारी वीज आपल्याकडे खेचून घेतो व जमिनीत पाठवतो. यामुळे इमारती व त्यांत राहाणारे लोक सुरक्षित राहातात.

**रिमोट कंट्रोल लॉक:** पलंगावर बसल्या-बसल्या एक दोर व पुली वापरून दरवाजा लॉक करता येतो.

## *गरीब रिचर्डच्या पंचांगात* बेन फ्रँकलिनने लिहिलेली वचने

मासे आणि पाहुणे, दोन्ही तीन दिवसांनंतर नकोसे होतात.

देव त्याचीच मदत करतो जो स्वत:ची मदत करतो.

तीन व्यक्ती एखादी गोष्ट गुप्त ठेवू शकतात, त्यांतील दोघांचा मृत्यू झालेला असेल तर!

माणूस आणि कलिंगड यांचे अंतरंग कळणे कठीण!

उसनवारी करणारा नेहमी दु:खी असतो.

लहान-लहान वार केले तर मोठमोठे वृक्षही उन्मळून पडतात.

गेलेली वेळ परत येत नाही.

प्रेम हवे असेल तर प्रेम करा आणि प्रेम मिळण्यास पात्र व्हा.

दररोज एक सफरचंद खा आणि डॉक्टरला दूर ठेवा.

कुत्र्यांच्या संगतीत राहिल्यावर अंगावर माशा बसणारच.

वाचाळवीर कृती कमीच करतात.

लवकर निजे, लवकर उठे तो निरोगी, श्रीमंत व शहाणा बने.

शहाणपणाची दारे सदैव उघडी असतात.

